सन २०२१-२२ या वर्षासाठीची प्रमाणके (Vouchers) नष्ट करण्यासंदर्भात सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांना सूचना देण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२५/प्र.क्र.०८/२५/कोषा.प्रशा.५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२५.

**प्रस्तावना**

महालेखापाल (ले.व.अ.)- १ महाराष्ट्र , मुंबई; महालेखापाल(ले.व.अ.)- २ महाराष्ट्र , नागपूर आणि अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांचे अभिरक्षेत असलेली लेखांकन वर्ष २०२१-२२ साठीची प्रमाणके दिनांक ०१-०४-२०२५ रोजी नष्टीकरणासाठी पात्र ठरणार आहेत. त्यामुळे यापैकी जी प्रमाणके फसवणूक, अपहार-अफरातफर, न्यायालयिन प्रकरणे यांच्याशी संबंधित असल्यामुळे जतन करून ठेवणे आवश्यक आहे, अशी प्रमाणके नष्ट न करता त्यांचे पृथक्करण / विभक्तीकरण करणे आवश्यक आहे.

२. सदर बाब विचारात घेता लेखांकन वर्ष २०२१-२२ साठीची जी प्रमाणके फसवणूक, अपहार-अफरातफर, न्यायालयीन प्रकरणे यांच्याशी संबंधित असल्यामुळे जतन करून ठेवणे आवश्यक आहे, अशा प्रमाणकांचा तपशिल संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून विहित नमुन्यात यथास्थिती महालेखापाल(ले.व.अ.)- १ महाराष्ट्र , मुंबई; महालेखापाल(ले.व.अ.)- २ महाराष्ट्र , नागपूर आणि अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयांस उपलब्ध करून दिला जाणे अभिप्रेत आहे. यासंदर्भात सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांना सूचना देण्याची विनंती प्रधान महालेखापाल (ले.व.अ.)- १ महाराष्ट्र , मुंबई यांच्या कार्यालयाने शासनास केली आहे.

३. या पार्श्वभूमीवर सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग आणि त्यांचे अधिनस्त सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक**

१) सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी लेखांकन वर्ष २०२१-२२ साठीची जी प्रमाणके फसवणूक, अपहार-अफरातफर, न्यायालयीन प्रकरणे यांच्याशी संबंधित असल्यामुळे जतन करून ठेवणे आवश्यक आहे, अशा प्रमाणकांचा तपशील या शासन परिपत्रकासोबतच्या **सहपत्र-अ** अन्वये विहित करण्यात आलेल्या नमुन्यात यथास्थिती महालेखापाल (ले.व.अ.) - १ महाराष्ट्र , मुंबई; महालेखापाल (ले.व.अ.)- २ महाराष्ट्र , नागपूर आणि अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई (जे लागू असेल त्याप्रमाणे) यांच्या कार्यालयांस दिनांक ३१ मार्च २०२५ पूर्वी पोहचेल अशा पद्धतीने न चुकता उपलब्ध करून द्यावा.

२) प्रस्तुत माहिती यथास्थिती महालेखापाल (ले.व.अ.)- १ महाराष्ट्र , मुंबई; महालेखापाल (ले.व.अ.)- २ महाराष्ट्र , नागपूर आणि अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयांस दिनांक ३१ मार्च २०२५ पर्यंत उपलब्ध करून देण्यात आली नाही, तर नष्टीकरणासाठी पात्र असलेल्या लेखांकन वर्ष २०२१-२२ साठीच्या प्रमाणकांपैकी कोणतीही प्रमाणके जतन करून ठेवण्याची आवश्यकता नसल्याचे गृहित धरून नष्टीकरणाच्या अनुषंगाने पुढील नियमोचित कार्यवाही यथास्थिती महालेखापाल (ले.व.अ.)- १ महाराष्ट्र , मुंबई; महालेखापाल (ले.व.अ.)- २ महाराष्ट्र , नागपूर आणि अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयांकडून केली जाईल, याची सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी नोंद घ्यावी.

३) सदर परिपत्रकातील सूचनांना अनुसरून अपेक्षित असलेली समुचित कार्यवाही क्षेत्रीय कार्यालयांकडून सत्वर केली जाईल हे सुनिश्चित करण्याची दक्षता सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग घेतील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०३०४१६१३५३५५०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR

Digitally signed by DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b8e8c3a034acb70f16af6f81c69ca038ff6f25ff78cfc9e6d815fd95b5367b07, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=37A42E182BACE4C129ABBEB54E27836D32D401560638F644A547867205474EE5, cn=DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
Date: 2025.03.04 16:15:11 +05'30'

( डॉ. राजेंद्र सुमन उत्तमराव गाडेकर )
शासनाचे उप सचिव

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
४. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
७. अ.मु.स./प्र.स./सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.

८. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख, व कार्यालय प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१५. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई.
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
२३. सर्व विभागीय आयुक्त,
२४. सर्व जिल्हाधिकारी,
२५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२७. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई,
२८. प्रादेशिक सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/ पुणे/ नाशिक/ छत्रपती संभाजीनगर/ अमरावती/नागपूर
२९. संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई,
३०. प्रादेशिक सह संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा कोकण/ पुणे/ नाशिक/ छत्रपती संभाजीनगर/अमरावती/नागपूर,
३१. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पुणे / नाशिक / छत्रपती संभाजी नगर /अमरावती /नागपूर
३२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३३. सर्व उप कोषागार अधिकारी,
३४. वित्त विभागातील सर्व कार्यासने,
३५. निवड नस्ती कोषा प्र.५

## शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२५/प्र.क्र.०८/२५/कोषा.प्रशा.५ , दिनांक - ०४ मार्च,२०२५ सोबतचे

**सहपत्र-अ**

## दिनांक ०१-०४-२०२५ रोजी नष्टीकरणासाठी पात्र ठरणा-या प्रमाणकांपैकी जतन करावयाच्या प्रमाणकांचा तपशील दर्शविणारे विवरणपत्र

| अ क्र | मुख्य लेखाशिर्ष | कोषागार कार्यालयाचे नांव | विभागाचे नांव / आहरण व संवितरण अधिकायाचे पदनाम | प्रमाणक क्रमांक व दिनांक | प्रमाणकाची एकूण रक्कम रुपये | प्रमाणक जतन करण्याचा उद्देश |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |

**विभाग प्रमुख /कार्यालय प्रमुख यांची स्वाक्षरी, नांव व पदनाम**

टीप : १) मुंबई शहर व उपनगर जिल्हयातील कार्यालये सदर माहिती अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई, यांना सादर करतील.

२) कोकण, नाशिक व पुणे विभागातील कार्यालये सदर माहिती महालेखापाल (ले.व.अ.)- १ महाराष्ट्र , मुंबई यांना सादर करतील.

३) छत्रपती संभाजी नगर , अमरावती आणि नागपूर विभागातील कार्यालये सदर माहिती महालेखापाल (ले.व.अ.)- २ महाराष्ट्र , नागपूर यांना सादर करतील.